**सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात राज्य शासनाच्या विविध कल्याणकारी योजनांबाबत जनजागृती, प्रबोधन व जनसंवादाकरिता माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत राबविण्यात येणाऱ्या जाहिरात व प्रसिद्धीसाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र. मावज-२०२३/प्र.क्र.१८९/कार्या-३४**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २८ जून, २०२३

**वाचा:**

१. शासन निर्णय सा.प्र.वि.क्र.मावज-२०२०/प्र.क्र.३३/कार्या-३४.दि.१६ मार्च २०२०
२. शासन निर्णय सा.प्र.वि.क्र.मावज-२०१८/प्र.क्र.२३९/कार्या-३४, दि.२६ मार्च २०२०
३. शासन निर्णय सा.प्र.वि.क्र.मावज-२०२२/प्र.क्र.१२९/कार्या-३४, दि.३१ जानेवारी २०२३
४. शासन निर्णय,सा.प्र.वि.क्र.मावज-२०२२/प्र.क्र.१२९/कार्या-३४,दि.१२ एप्रिल, २०२३
५. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांचे पत्र क्र.वृत्तचित्र-२०२३/२४/वर्षपूर्ती/ जा.प्र./कार्या-७/२२४,दि.२३ जून, २०२३.

**प्रस्तावना :-**

राज्य शासनाच्या विविध लोककल्याणकारी योजनांची माहिती नागरिकांना होण्यासाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत विविध माध्यमांद्वारे प्रसिद्धी करण्यात येते. दिनांक ३० जून, २०२३ पासून विविध माध्यमांद्वारे लोककल्याणकारी योजनांबाबत नागरिकांमध्ये जनजागृती, प्रबोधन करण्याकरिता तसेच, विविध योजना/ उपक्रमांचा लाभ जास्तीत जास्त नागरिकांनी घ्यावा, तसेच, शासकीय योजनांचा लाभ कशाप्रकारे घ्यावा, याबाबत त्यांना मार्गदर्शन व्हावे, याकरिता राज्य शासनाच्या विविध विभागांनी केलेल्या कल्याणकारी, समाजहिताच्या योजनांवर/विकास कामांवर आधारित महत्त्वाच्या निर्णयांची प्रसिद्धी करण्याचे प्रस्तावित आहे. त्यानुसार मंत्रिमंडळाने घेतलेले महत्त्वाचे निर्णय तसेच विकासकामांची माहिती विविध माध्यमांद्वारे प्रसिद्ध करणे याकरीता माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत जाहिराती तयार करणे, वितरण करणे, सर्वंकष जाहिरात मोहिम आखणे आणि मोहिमेची अंमलबजावणी करणे इत्यादी कामे करण्यात येणार आहेत. विशेष प्रसिद्धी मोहिमेअंतर्गत प्रचलित तसेच नव माध्यमांव्दारे शासकीय योजनांची माहिती व जनजागृती करण्यासाठी अंदाजित खर्चाचा माध्यम आराखडा तयार करण्यात आला असून तो माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत टप्प्या टप्प्याने राबविण्याचे प्रस्तावित आहे.

**शासन निर्णय:-**

राज्य शासनाने गेल्या वर्षभरात राबविलेल्या जनकल्याणकारी योजनांची, शासकीय उपक्रमांची व्यापक प्रसिद्धी व प्रसार करण्यासाठी, जनजागृती/ जनप्रबोधन करण्यासाठी विशेष प्रसिद्धी मोहिम पुढील कार्यपद्धतीनुसार मुद्रित व इलेक्ट्रॉनिक माध्यमांद्वारे राबविण्यास

तसेच त्यासाठी येणाऱ्या खर्चास  या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे :-

अ) शासनाच्या विविध विभागांच्या योजनांवर आधारित जाहिरातींची निर्मिती करण्याकरिता जाहिरात क्षेत्रातील विशिष्ट अनुभव व व्यावसायिक अर्हता प्राप्त जाहिरात संस्थांची सूची उक्त संदर्भ क्रमांक  १ येथील दिनांक १६.०३.२०२० च्या शासन निर्णयान्वये  निश्चित करण्यात आली आहे. सदर जाहिरात संस्थांना उक्त संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक १२.०४.२०२३ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली आहे. या शासन निर्णयात नमूद संस्थांमार्फत विहित कार्यपद्धतीचा अवलंब करुन शासकीय संदेशाची  निर्मिती करण्यात येईल.

ब) वर्तमानपत्रांमधून DGIPR दराने व राज्याबाहेरील वर्तमानपत्रांमधून DAVP च्या दराने शासकीय संदेश प्रसारणासाठी देण्यात येतील. तसेच इलेक्ट्रॉनिक माध्यमांमधून DAVP च्या दराने शासकीय संदेश प्रसारणासाठी देण्यात येतील.

वरील कार्यवाहीसाठी बाबत येणाऱ्या अंदाजित खर्चाचा तपशिल पुढील विवरणपत्राप्रमाणे राहील :-

| क्र. | बाब | तपशील | अंदाजे खर्च रुपये (सर्व करांसहीत) |
|---|---|---|---|
| १ | शासकीय संदेशाची संदर्भ साहित्याची निर्मिती करणे | TVC / Audio / Print & Digital Hoarding / Adaptation आदी | ६,१०,३५,००० |
| २ | राज्यातील मुद्रित माध्यमांद्वारे प्रसिद्धी | Print/ Advertorial/ QR Code आदी | १७,००,००,००० |
| | राज्याबाहेरील मुद्रित माध्यमांद्वारे प्रसिद्धी निवडक वृत्तपत्रे | | २,००,००,००० |
| ३ | लोकराज्य विशेषांक निर्मिती | डिझाईन, मुद्रण ,वितरण आदी | ५०,००,००० |
| ४ | इलेक्ट्रॉनिक माध्यमांद्वारे प्रसिद्धी | Electronic / TV / News / Radio / Community Radio Channels / Cinema Halls आदी | ९,१२,००,००० |
| | एकूण अंदाजे रक्कम (रुपये चौतीस कोटी बहात्तर लाख पस्तीस हजार फक्त) | | **३४,७२,३५,०००** |

२. विशेष प्रसिद्धी मोहीम राबविण्यासाठी येणाऱ्या खर्चाची उपरोक्त तक्त्यामध्ये दर्शविण्यात आलेली रक्कम अंदाजित असून एखाद्या माध्यमाव्दारे प्रसिध्दी न झाल्यास सदर माध्यमाची रक्कम उपरोक्त तक्त्यामधील इतर कोणत्याही माध्यमामध्ये आवश्यकतेनुसार वापरण्यास तसेच एखाद्या माध्यमामध्ये बदल करण्यास, तसेच, वरील प्रसिद्धी आराखड्यानुसार कार्यवाही करताना अनुभव आणि क्षमता लक्षात घेऊन माध्यमांची निवड, माध्यमांच्या वापराचा आकार, जाहिरातीचा कालावधी आणि वारंवारीता ठरविण्याबाबतचे अधिकार महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांना असतील.

३. प्रस्तुतचा खर्च सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र.ए-६, २२२०-माहिती व प्रसिध्दी, ६०- इतर, १०१ जाहिरात व दृक प्रसिध्दी (००) (०३) शासकीय योजनांची विशेष प्रसिध्दी मोहीम (योजनांतर्गत), २६-जाहिरात व प्रसिध्दी (संगणक सांकेतांक क्र.२२२०११७५) या लेखाशीर्षातर्गत सन २०२३-२४ मधील मंजूर अनुदानातून बीम्स प्रणालीवर उपलब्ध तरतुदींच्या मर्यादेत आवश्यक व महत्त्वाच्या बाबींवर करण्यात यावा. सदरहू खर्च त्या त्या प्रयोजनांसाठी उपलब्ध असलेल्या तरतुदीमधूनच भागविण्यात यावा. याकरिता कोणताही अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

४. प्रस्तुत शासकीय योजनांच्या विशेष प्रसिद्धी मोहिमेअंतर्गत खर्च करताना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / आदेश / परिपत्रके यानुसार तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७/०४/२०१५ अन्वये निर्गमित वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील तरतुदींचे / अटी व शर्तीचे पालन करुन तसेच उक्त संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय सा. प्र. वि. क्र. मावज-२०१८/प्र.क्र.२३९/का-३४ दि.२६ मार्च, २०२० अन्वये वित्तीय नियम पुस्तिका सन १९७८, भाग-२ प्रपत्र-अ, अनु.क्र.१, २ व ३ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचे तसेच, खरेदी प्रक्रियेबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि.१ डिसेंबर, २०१६ च्या तरतुदीनुसार, तसेच अन्य अनुषंगिक शासननिर्णयातील तरतुदींचा तसेच प्रचलित ई-निविदा प्रक्रिया/ CVC निर्देश /CAG मार्गदर्शक तत्वे इत्यादींचे काटेकोरपणे पालन करुन खर्च करण्यात यावा व त्यानुसार विहित केलेल्या कार्यपद्धतीचा अवलंब करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २२६/१४४३, दि.२७.०६.२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३४१/व्यय-४, दि.२८.०६.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०६२८१९४५०११२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RIMA SUBHASH DUTTAROY

Digitally signed by RIMA SUBHASH DUTTAROY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=487393c812e41c98e63a7a73c63e1d078da4c3c899b4307a07d4d99b40a7d635, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B813A4CECE1744D0527A20F20D15FC2FFC7D4457A8AE2120E0D35781B42C049C, cn=RIMA SUBHASH DUTTAROY
Date: 2023.06.28 19:46:10 +05'30'

**( रिमा दत्तरॉय )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

४) मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५) मा.सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७) मा.उपसभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८) मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०) सर्व मा.विधान परिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
११) अ.मु.स./प्र.स./सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२) सहसचिव, वित्त विभाग (कार्या-व्यय-४),मंत्रालय, मुंबई - ३२.
१३) सहसचिव, नियोजन विभाग (कार्या-१४४३), मंत्रालय, मुंबई-३२
१४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
१५) उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१६) महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई, नागपूर,
१७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१८) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१९) लेखाधिकारी (आहरण व संवितरण), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२०) मंत्रालयाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख.
२१) भारतीय जनता पक्ष, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.कुटीर क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०२०.
२२) भारतीय राष्ट्रीय कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस(इं.) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०० ०२५.
२३) राष्ट्रवादी कॉंग्रेस पक्ष, ठाकरसी हाऊस, जे.एन.हेरेडिया मार्ग, बॅलार्ड इस्टेट, मुंबई -४०० ०३८.
२४) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८.
२५) बहुजन समाज पक्ष, प्रदेश सचिव, महाराष्ट्र राज्य, बी.एस.जी.भवन, भूखंड क्र.८३-ए, कलेक्टर कॉलनी, चेंबूर, मुंबई-४०० ०७४.
२६) भारतीय कम्युनिस्ट पक्ष, महाराष्ट्र समिती, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल मार्ग, मुंबई -४०० ००४.
२७) भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पक्ष, महाराष्ट्र समिती, जनशक्ती सभागृह, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-४०० ०१३.
२८) महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई-२८.
२९) निवडनस्ती (का.३४), सामान्य प्रशासन विभाग.